<u>मोबाईल टॉवर्सवर मालमत्ता कर आकारण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्र. ठामपा-२११७/प्र.क्र.९२/नवि-२३.**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-१६ मे, २०१७

<u>वाचा :-</u> मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ५३६०-५३६३/२०१३, अहमदाबाद महानगरपालिका विरुध्द जीटीएल इन्फ्रास्ट्रक्चर लि. व इतर प्रकरणी दिलेल्या न्याय निर्णय.

**<u>प्रस्तावना :-</u>**

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.५३६०-५३६३ /२०१३ अहमदाबाद महानगरपालिका विरुध्द जीटीएल इन्फ्रास्ट्रक्चर लि. व इतर यांसह अन्य ३९ सिव्हील अपील एकत्रित करुन दिनांक १६.१२.२०१६ रोजी आपला न्याय निर्णय दिलेला आहे.उपरोल्लेखित सिव्हील अपीलमध्ये मा. गुजराथ उच्च न्यायालयाच्या निर्णयासोबत मा.मुंबई उच्च न्यायालयात विविध रिट याचिकांमध्ये मोबाईल टॉवर्सवर मालमत्ता कर आकारण्याबाबत दिलेल्या निर्णयाच्या विरुध्द दाखल अपील विचारात घेण्यात आली. मा. सर्वोच्च न्यायालयाने आपल्या दिनांक १६.१२.२०१६ च्या निर्णयातील परिच्छेद ३०, ३१, ३२ व ३३ पुढीलप्रमाणे :-

(अ) **<u>परिच्छेद ३०</u>** :- "The measure of the levy, though may not be determinative of the nature of the tax, cannot also be altogether ignored in the light of the views expressed by this court in Goodricks (supra). Under both the Acts read with the relevant Rules, tax on Mobile Towers is levied on the yield from the land & building calculated in terms of the rateable value of the land & building. Also the incidence of the tax is not on the use of the plant & machinery in the Mobile Tower; rather it is on the use of the land or building, as may be, for purpose of the mobile tower. That the tax is imposed on the "person engaged in providing telecommunication services through such mobile towers. (Section 145 A of the Gujarat Act) merely indicates that it is the occupier and not the owner of the land and building who is liable to pay the tax. Such a liability to pay the tax by the occupier instead of the owner is an accepted facet of the tax payable on land and building under Entry 49 List II of the Seventh Schedule."

(ब) **<u>परिच्छेद ३१</u>** :- Viewed in the light of the above discussion, if the definition of "land and building" contained in the Gujarat Act is to be understood, we do not find any reason as to why, thought in common parlance and in everyday life, a mobile tower is certainly not a building, it would also cease to be a building for the purposes of Entry 49 List II so as to deny the State Legislature the power to levy a tax thereon. Such a law can trace its source to the provisions Entry 49 List II of the Seventh Schedule to the Constitution.

(क) **<u>परिच्छेद ३२</u>** :- Though several other decisions of this Court and also of different High Courts have been placed before us we do not consider it necessary to refer to or to enter into any discussion of the propositions laid down in the said decisions as the views expressed in all the aforesaid cases pertain to the meaning of

the expressions land and building as appearing in the definition clause of the statutes in question.

(ड) **परिच्छेद ३३** :- We therefore, set aside the judgment passed by the Gujarat High Court and answer the appeals arising from the order of the Bombay High Court transferred cases and the writ petitions accordingly. However, we have it open, so far as the cellular operators in the Bombay cases are concerned, to agitate the issue with regard to the retrospective operation of the assessment/demand of tax and the quantum thereof before the appropriate forum, if so advised. Consequently, and in the light of the above all the appeals, writ petitions and the transferred cases are disposed of.

मा.सर्वोच्च न्यायालयाचा वरील निर्णय नागरी क्षेत्रातील स्थानिक स्वराज्य संस्थांना सूचित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या सिव्हील अपील क्र.५३६०-५३६३ /२०१३ अहमदाबाद महानगरपालिका विरुध्द जीटीएल इन्फ्रास्ट्रक्चर लि. व इतर, दिनांक १६.१२.२०१६ च्या आदेशास अनुसरुन नागरी क्षेत्रातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांना सूचित करण्यात येते की, मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार मोबाईल टॉवर उभारण्यात आलेल्या ठिकाणी (मोकळया जागा अथवा टेरेस/ अस्तित्वातील इमारतींमधील मोकळया जागा) मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ तसेच महाराष्ट्र नगर परिषद, नगर पंचायत व औद्योगिक नागरी अधिनियम, १९६५ व तत्सम अधिनियमातील मालमत्ता कर लागू करण्याच्या तरतुदीनुसार मालमत्ता कर आकारण्यात यावा.

याबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यांत यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०१७०५१७१६०१२५८९२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2017.05.17 16:07:22 +05'30'

**( अजित म.कवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) प्रधान सचिव (नवि-१) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय
६) आयुक्त, सर्व महानगरपालिका
७) मुख्याधिकारी/ प्रशासक सर्व नगरपालिका, नगरपंचायत
८) निवड नस्ती (नवि-२३).